**श्री. जितेंद्र रामदासजी निखाडे, विभाग प्रमुख, माहिती तंत्रज्ञान यांचे निलंबन रद्द करुन त्यांना सेवेत पुनर्स्थापित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्र. विभाचौ-४२२२/प्र.क्र.१२७/२२/तांशि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, (विस्तार) मुंबई- ४०० ०३२,
दिनांक: १४ जुलै, २०२३.

**संदर्भ:** १) शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१५/१५/आस्था-२, दि.१४/०६/२०१६.
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.निप्रआ-१११८/प्र.क्र.११/११-अ, दि. ०९/०७/२०१९.
३) शासन आदेश क्र. विभाचौ-११२२/प्र.क्र.१२७/२२/तांशि-७, दि.०९/१२/२०२२.

**प्रस्तावना:**

श्री. जितेंद्र रामदासजी निखाडे, विभाग प्रमुख, माहिती तंत्रज्ञान, शासकीय तंत्रनिकेतन हे तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई येथे सहायक संचालक (तां.) या पदावर कार्यरत असतांना त्यांचेविरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने केलेल्या कारवाईच्या अनुषंगाने त्यांना संदर्भ क्र.३ येथील आदेशान्वये निलंबीत करण्यात आले आहे.

तथापि, श्री. निखाडे यांच्या निलंबनाचा कालावधी ०३ महिन्यांपेक्षा जास्त झाला असून सदर कालावधीत त्यांची विभागीय चौकशी करुन दोषारोपपत्र बजाविण्यात आले नाही. यास्तव मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र.१९१२/२०१५ मध्ये दि.१६/०२/२०१५ रोजी दिलेल्या आदेशानुसार सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र.०२ येथील शासन निर्णयातील तरतुदींस अनुसरुन श्री. निखाडे यांचे निलंबन समाप्त करण्याशिवाय अन्य पर्याय राहत नसल्याने प्रस्तुत प्रकरण या विभागाच्या निलंबन आढावा समितीसमोर सादर करण्यात आले. निलंबन आढावा समितीने दि.१०/०४/२०२३ रोजीच्या बैठकीत शिफारस केल्यानुसार श्री. निखाडे यांचे निलंबन रद्द करुन त्यांना सेवेत पुनर्स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :**

श्री. जितेंद्र रामदासजी निखाडे, सहायक संचालक (तां.), तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई (मूळ पदनाम : विभाग प्रमुख, माहिती तंत्रज्ञान, शासकीय तंत्रनिकेतन ) यांचे संदर्भ क्र.३ येथील शासन आदेशान्वये केलेले निलंबन संपुष्टात आणण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. श्री. निखाडे यांना शासन सेवेत पुनर्स्थापित केल्यानंतर त्यांची पदस्थापना प्रशासकीय कारणास्तव शासकीय तंत्रनिकेतन, ठाणे येथील विभाग प्रमुख, माहिती तंत्रज्ञान या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

**०२.** हे आदेश तात्काळ अंमलात येतील. श्री. निखाडे यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. सहसंचालक,तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई यांनी त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**०३.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७१४१७५३४५८५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2023.07.14 17:57:15 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. जितेंद्र रामदासजी निखाडे, विभाग प्रमुख, माहिती तंत्रज्ञान, शासकीय तंत्रनिकेतन
(तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

२) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

४) सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई,

५) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, ठाणे,

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,

७) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे,

८) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन ११-अ), मंत्रालय, मुंबई-३२,

९) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

१०) निवडनस्ती (तांशि-७).